ISSN 2278-8808 SJIF 2014 = 4.889
An International Peer Reviewed & Referred
SCHOLARLY RESEARCH JOURNAL
FOR INTERDISCIPLINARY STUDIES

# म ठाकूर समुदाय संग्रहालय:एक संकल्पना

वजय अनंत कुलकर्णी, .

सहयोगी प्राध्यापक, सोनुभाऊ बसवंत महा वद्यालय,शहापूर,ठाणे.

**Abstract**

महाराष्ट्राच्या ठाणे जिल्ह्यातील शहापूर एक आदिवासी तालुका आहे. या तालुक्यात म ठाकूर, महादेव कोळी,कातकरी,वारली अशा आदिवासी जमाती राहतात. या जमातीपैकी म ठाकूर समाज लोकसंख्येने अ धक आहे. पारंपरिक शेती, शकार, देवदेवतांच्या पूजा -प्रार्थना, वेशभूषा, हत्त्यारे, अवजारे, माती व दगडाची भांडी असे पारंपरिक जीवन ही त्यांची वै शष्ट्ये आहेत. परंतु बदलत्या काळात पारंपरिक गोष्टी हळूहळू लोप पावत चाललेले आहे. येणारि नवीन पढी परंपरा-संस्कृती पासून दुरावत चाललेली आहे. म ठाकुर समुदाय संस्कृतीचे जतन समुदाय संग्रहालयाद्वारे कसे करता येईल हे या लेखाद्वारे सद्ध करणे हा या लेखाचा उद्देश आहे.

की वर्डस: १)संग्रहालय २)समुदाय संग्रहालय ३)समुदाय ४)समुदाय संग्रहालय ५)म ठाकुर समाज ६)परंपरा ७)वारसा ८)जतन

प्रस्तावना: प्राचीन वस्तु-अवशेषांचे जतन आ ण संवर्धन करणे, देशाचा वैभवशाली सांस्कृतिक वारसा पुढच्या पढीकडे नेणे, शक्षण, ज्ञान, संशोधन, मनोरंजन ही वस्तुसंग्रहलयाची उद्दिष्टे सर्वश्रुत आहेत. ईस्ट इं डया कंपनीच्या काळात सर वल्ल्यम जोन्स



यांच्या पुढाकाराने ए शयाटिक सोसायटीची स्थापना १५ जाने.१७८४ रोजी झाली.

संस्थेकडे प्राचीन वस्तु-अवशेषांचा संग्रह होवू लागला आ ण भारतातील पहिले वस्तुसंग्रहालय ई.स.१८१४ मध्ये कलकत्ता येथे स्थापनझाले.[i] या नंतर भारतात  व वध स्वरूपाची वस्तुसंग्रहालये स्थापन झाली. काळनुसार वस्तुसंग्रहालयांची उद्दिष्टे व स्वरूप बदललेले आहे. न वन प्रकार उदयास येत असून समुदाय संग्रहालय हा त्यातील एक न वन प्रकार असून तो प्रथम इंग्लंड,अमेरिकेत उदयास आला **(Anacostia Museum Washington 1967, Galsgow-U.K.1989)** भारत हा बहुभा षक, बहुधा र्मक व बहू सांस्कृतिक देश असून प्रत्येक समुदायाची स्वतःची एक स्वतंत्र संस्कृती आहे. वाढत्र शहरीकरण, औद्यो गकरण, शक्षण आ ण रोजगार या मुळेगावचा तुटलेला संपर्क या काही कारणांमुळे समुदाय संस्कृती लोप पावत आहे. या साठी समुदाय संग्रहालय याची गरज आहे.   म ठाकूर शब्दाची व्युत्पत्ती  भारतामध्ये सध्या ४६१ आदिवासी जमाती असून त्याचे पाच भाग पडतात. त्यातील महाराष्ट्राचा भाग हा प.भारतामध्ये येतो की ज्यात ४८ आदिवासी जमाती आहेत. ठाकूर, वारली, कोळी, भल्ल, कातकरी, कोकणा ई. प्रमुख जमाती असून आदिवासी लोकसंख्येच्या बाबतीत महाराष्ट्राचा देशात सहाव्वा क्रमांक आहे. म ठाकूर समाज हा फक्त महाराष्ट्रातच असून ठाणे, पुणे, नगर, ना शक, रायगड, अजिंठा पर्वतरांग येथे आहे. ठाकूर आ ण ठाकर अशा दोनही नावांनी ओळखले जातात. यां सर्व आदिवासी समाजाला  अनुसूचीत जमाती(एस.टी.)असे संबोधले जाते.[iii]  ठाकूर शब्दाची व्युत्पत्ती तस्कर या शब्दापासून झालेली आहे असे  व.का.राजवाडे आ ण कत्त्यायन यांनी मांडलेले आहे. मध्ययुगात सुलतान महमदाच्या आक्रमणामुळे गुजराथमधील ठक्कर रानावनात पळून गेले त्या सर्वांना ठाकूर असे म्हंटले जाते. असे मत डॉ.  वल्सन यांनी मांडले आहे. ठाकूरांमध्ये म आ ण क असे दोन प्रमुख वर्ग आहेत. ठाकूर लोकांच्या बोलण्यात म आ ण क या वर्णांचा वारंवार उपयोग होत असल्याने त्यांना ही नावे पडली असावीत असे ना.गो.चापेकर यांचे मत आहे तसेच त्यांच्या मते म म्हणजे महाल देशातून आलेले ते म ठाकूर होय.[i] अजिंठा प्रांतात यांना मह आ ण कह असेही

म्हणतात त्यापैकी मह −म हे स्वत:ला मराठा ठाकर समजतात. या जमातीत महादेव हे दैवत असल्याने म ठाकूर-ठाकर हे नाव पडले असावे.

शहापुरातील म ठाकूर समाज: महाराष्ट्राच्या काही व शष्ट भागात रहाणारा म ठाकूर समाज शहापूर तालुक्यात अनेक वर्षे पारंपरिक पद्धतीने रहात आहे. प्रत्येक समाजाची एक व शष्ट संस्कृती, परंपरा, चालीरिती असतात. त्या प्रमाणे ते आपले जीवन व्यतीत करीत असतात. शहापूर परिसरात रहाण्याऱ्या म ठाकूर समाजाबाबतही हेह चत्र आहे. गवती छप्पर असणारी घरे(मराड), पाटा-वरवंटा, उखळ-मुसळ (लाकडी व दगडी), जाते, खड्ड्यातील चूल, धान्य भरून ठेवण्याची कणगी, बांबूच्या टोपल्या व सुप, मातीची भांडी, यासारख्या अन्न्य बाबी, पारंपरिक शेती, शकार, शेतीपूरक उदद्योग, ववाह पद्धत, वेशभूषा, अलंकार, व वध प्रसंगी गायली जाणारी गाणी, कुटुंब व्यवस्था, मरणोत्तर जीवन अशी या संस्कृतीची अन्न्य संस्कृतीसारखी वै शष्ट्ये आहेत. पारंपरिक शेती मध्ये गवत जाळणे, पेरणी करणे, नांगरणे, लावणी, बेणनी, कापणी व झोडणी, भरडणी (मोठे दगडी जाते) यांचा समावेश आहे. लाकडी नांगर, फाळ, फावडी, टिकाव, कोयता, वळा, खुरपणी, कुदळ, आळवट (जमीन सपाट करण्यासाठी) पहार, पंजा, इरले, घोंगडी ई.अवजरांचा-साधनांचा उपयोग केला जातो. प्रामुख्याने भातशेती असून नाचणी, वरई, उडीद यांचेही उत्पादन घेतेले जाते. शेतातली कामे संपल्यानंतर जंगलातील फळे, कंदमुळे, पळसाची पाने, सुके गवत जमा करणे, बांबू पासून टोपल्या-पाट्या वणणे अशी कामे केली जातात. शकार आ ण मासेमारी यांनाही महत्व आहे. त्यासाठी अनुक्रमे धनुष्य-बाण, भाले, कुऱ्हाड, कोयता, वळा, वागुड (दोरीचे मोठे जाळे), जाळी, गळ आदींचा वापर केला जातो. वेशभूषे मध्ये धोतर व बंडी हा पुरुषांचा तर साडी व पोलकेहा महिलांचा तसेच परकर-पोलके हा मुलींचा पेहराव आहे. अंबाडा-बुचडा, वेणी, केसांना जाळी, काटे- चमटे अशी केशभूषा महिलांची आहे.नथ, बांगडी, बुगडी, जोडवी, अनेक मण्यांची माळ हे अलंकार आहेत.

ववाहात वर- वधू मुंडावळी बा शंग लावतात. मुलाकडून मुलीला मंगळसूत्र आ ण धान्यरूपाने देज दिला जातो. नवरदेव आल्यानंतर महिलांकडून लग्नाची वशेष गाणी गायली जातात. मांडव, हळदी, तेल, बा शंग आ ण प्रत्यक्ष लग्न असा पाच दिवस ववाह समारंभ असतो.लग्नाच्या दिवशी नवरीकडून गावजेवण असते. मुलीची परिस्थिति बेताची असल्यास गावातील अन्य व्यक्ती जबाबदारी घेते. सांस्कृतिक जीवन: धा मक कल्पना, नृत्य, गायन सणसमारंभ यांना सांस्कृतिक जीवनामध्ये महत्व बोहाडा म्हणतात. निसर्ग देवतांची आराधना, दुष्काळ, रोगराई पासून संरक्षण, पूर्वजांची आठवण या साठी नृत्य-गायन यांना महत्व आहे.ढोल हे वाद्य लोक प्रय आहे. होळी, पोळा, नवरात्र आ ण दिवाळी हे महत्वाचे सण आहेत. खंडोबा, कान्होबा, वाघोबा, वणी, जीवदानी गावदेवी या देवता आहेत. भरलेला तांब्याचा कळस की ज्यात सुपारी, तांदूळ, आंब्याची पाने आ ण नारळ ठेवून घट बस वला जातो. हा घट काही महिला दुसऱ्या गावी घेवुन जातात आ ण तेथे भोंडवा गीत गातात. ववाहाच्या आदल्या रात्री कुळाच्या देवतेसाठी गाणे म्हंटले जाते त्याला तेलाचे गीत म्हणतात. ववाहाच्या गीतात नवरा, नवरी, वरमाय यांचे उल्लेख असतात. पोळ्याचा रात्री वाडीतल्या प्रमुखाच्या (पाडखोत) अंगणात महिला व पुरुष रिंगण धरून नृत्य व गायन करतात. याला टाळ्याचे गीत असे म्हणतात.

निष्कर्ष: म ठाकूर समुदायाची ही सर्वसाधारण माहिती आहे. काळाच्या ओघात सर्वत्र बदल होत आहेत. त्याला हा समुदायही अपवाद नाही. येणाऱ्या नवीन पढीला आपल्या पूर्वजांची संकृती माहिती असणे गरजेचे आहे. उदा.लाकडी वा दगडी उखळ-मुसळ, पाटा-वरवंटा, लाकडी परात, शेतीची अवजारे, घरातील अन्य वस्तू, शकारीची पद्धत् व हत्त्यारे, पारंपरिक शेती, गीत-नृत्ये, बोली भाषा,वेश आ ण केशभूषा, घरे अशा अनेक गोष्टी काळाच्या ओघात बदलत चाललेल्या आहेत. कोणत्याही समुदाय-समाज घटकातील बदल स्वागतार्ह आहेत. मात्र अशा एका वशीष्ट समुदायाची वै शष्टपूर्ण संस्कृतीचे संग्रहालयाच्या माध्यमातून जतन करणे गरजेचे आहे. याचे

स्पष्टीकरण उद्देशामध्ये स्पष्ट केलेले आहे. यासाठी म ठाकूर समुदायाची संस्कृती काशी आहे हे स्पष्ट करण्यासाठी काही छाया चत्रे दिलेली आहेत. त्यावरून समुदाय संग्रहालय ही संकल्पना स्पष्ट होते.













पारंपरिक वेशभूषा


ववाह पद्धत


ववाह

संदर्भ :

i देव शा.मा. पुरातत्वशास्त्र प्रू.४१

ii समेळ,रानडे,नाबर- पुरातत्वशास्त्र, वस्तुसंग्रहालयशास्त्र,ग्रंथालयशास्त्र पृ.१७०

iii वारूळ-आदिवासी साहित्य वशेषांक पृ.४१

iv कत्ता

v भारतीय संस्कृती कोश खंड ३ पृ .३४३ -३४७

